**अल्पसंख्याकांच्या कल्याणाकरिता मा.पंतप्रधानाच्या नवीन १५ कलमी कार्यक्रमाची प्रभावीपणे अंमलबजावणी करण्यासाठी जिल्हास्तरीय अल्पसंख्याक कल्याण समितीतील नामांकित संस्थांतील प्रतिनिधीची नियुक्ती रद्द करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**अल्पसंख्याक विकास विभाग,**

**शासन निर्णय क्रमांक- अविवि २०१५/प्र.क्र. २४०/का.९**

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,

दिनांक : ११.०६.२०२०

वाचा:- १) शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग, क्र. अविवि-२०१५/प्र.क्र. २४०/का.९, दिनांक- १५.४.२०१७

२) शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग, क्र. अविवि-२०१५/प्र.क्र. २४०/का.९, दिनांक- २३.८.२०१८

३) शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग, क्र. अविवि-२०१५/प्र.क्र. २४०/का.९, दिनांक- ११.९.२०१८

४) शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग, क्र. अविवि-२०१५/प्र.क्र. २४०/का.९, दिनांक- ६.७.२०१९.

**प्रस्तावना :**

राज्यातील अल्पसंख्याक समाजाच्या सामाजिक, शैक्षणिक आणि आर्थिक उन्नतीसाठी तसेच स्थानिक अल्पसंख्याकांच्या समस्या तातडीने सोडविण्यासाठी राज्यातील प्रत्येक जिल्हयात जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखाली शासन निर्णय दि.१५.४.२०१७ अन्वये जिल्हास्तरीय अल्पसंख्याक कल्याण समिती स्थापन करण्याचा निर्णय घेण्यात आला आहे.

२. सदर समितीवर संबंधित जिल्हयाचे जिल्हाधिकारी हे अध्यक्ष व जिल्हयातील अल्पसंख्याकांच्या कल्याणाशी संबंधित इतर अधिकारी, जिल्हयातील सर्व लोकसभा सदस्य, जिल्हयातील सर्व विधानसभा सदस्य, राज्यातील प्रत्येक जिल्हयाकरिता केंद्र शासनाने नामनिर्देशन केलेल्या एक राज्यसभा सदस्य, ग्रामीण तसेच नागरी क्षेत्रातील अल्पसंख्याक कल्याणाशी संबंधित स्थानिक पंचायत राज संस्थांचे प्रतिनिधी, तसेच जिल्हयातील अल्पसंख्याकांसाठी काम करणाऱ्या तीन नामवंत अशासकीय स्वंयसेवी संस्थांचे प्रतिनिधी यांचा सदस्य म्हणून समावेश केला आहे.

३. उपरोक्त विवेचनानुसार शासन निर्णय दि. १५.४.२०१७ अन्वये स्थापन केलेल्या जिल्हास्तरीय अल्पसंख्याक कल्याण समितीच्या रचनेतील (ई) प्रमाणे सर्व जिल्हयातील अल्पसंख्याकांसाठी काम करणाऱ्या नामवंत संस्थांचे संदर्भीय शासन निर्णय दि. २३.८.२०१८ अन्वये प्रत्येक जिल्हयाकरिता एक अशासकीय प्रतिनिधी, मुंबई उपनगर जिल्हयाकरिता संदर्भीय शासन निर्णय दि. ११.९.२०१८ अन्वये उर्वरित दोन अशासकीय प्रतिनिधी तर सांगली जिल्हयाकरिता संदर्भीय शासन निर्णय दि. ६.७.२०१९ अन्वये उर्वरित दोन अशासकीय प्रतिनिधी यांची नियुक्ती करण्यात आली आहे. आता सदर नियुक्त्या रद्द करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

## शासन निर्णय :

राज्यातील अल्पसंख्याक समाजाच्या सामाजिक, शैक्षणिक आणि आर्थिक उन्नतीसाठी तसेच स्थानिक अल्पसंख्याकांच्या समस्या तातडीने सोडविण्यासाठी राज्यातील प्रत्येक जिल्हयात जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखाली शासन निर्णय दि.१५.४.२०१७ अन्वये जिल्हास्तरीय अल्पसंख्याक कल्याण समिती स्थापन करण्याचा निर्णय घेण्यात आला आहे. सदर समितीच्या रचनेमधील (ई) येथील जिल्हयातील अल्पसंख्याकांसाठी काम करणाऱ्या नामवंत अशासकीय संस्थांचे प्रतिनिधी यांची शासन निर्णय दि. २३.८.२०१८ अन्वये प्रत्येक जिल्हयाकरिता एक अशासकीय प्रतिनिधी, मुंबई उपनगर जिल्हयाकरिता शासन निर्णय दि. ११.९.२०१८ अन्वये उर्वरित दोन अशासकीय प्रतिनिधी तर सांगली जिल्हयाकरिता शासन निर्णय दि. ६.७.२०१९ अन्वये उर्वरित दोन अशासकीय प्रतिनिधी यांच्या केलेल्या नियुक्त्या या शासन निर्णयान्वये रद्द करण्यात येत आहेत.

२. संबंधित जिल्हयाचे जिल्हाधिकारी यांना कळविण्यात येते की, शासन निर्णय दि. १५.४.२०१७ मध्ये नमूद ग्रामीण तसेच नागरी क्षेत्रातील अल्पसंख्याक कल्याणाशी संबंधित स्थानिक पंचायत राज संस्थांचे प्रतिनिधी, तसेच जिल्हयातील अल्पसंख्याकांसाठी काम करणाऱ्या तीन नामवंत अशासकीय स्वंयसेवी संस्थांचे प्रतिनिधी यांची नामनिर्देशने शासन निर्णय दि. १५.४.२०१७ मध्ये नमूद केलेल्या विहित पध्दतीनुसार तपासून आपल्या शिफारशीसह शासनास सादर करावीत.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक क्र. २०२००६१११५०८२५३२१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Dinesh M. Sonavane

Digitally signed by Dinesh M. Sonavane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Minorities Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9cabb099fd0576208f4caa310d2e7860201ab5363a2133e0927ff26c0f016fdf, serialNumber=6adb2bdbbd3bd651a8ade806b6e4aea66daa5512ea788889af1515751abc0181, cn=Dinesh M. Sonavane
Date: 2020.06.11 15:34:17 +05'30'

**( दि.मा.सोनवणे )**
**उप सचिव,महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. राज्यपालांचे सचिव ,
२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
३) सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४) सर्व संबंधित मा.लोकसभा/मा. राज्यसभा सदस्य
५) सर्व संबधित विधानसभा सदस्य
६) मा.मुख्य सचिव, यांचे सहसचिव, मंत्रालय, मुंबई
७) अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव सर्व मंत्रालयीन विभाग,
८) संचालक, अल्पसंख्याक कार्य मंत्रालय, भारत सरकार, नवी दिल्ली.
९) सर्व विभागीय आयुक्त,
१०) सर्व जिल्हाधिकारी,

११) मुख्य कार्यकारी अधिकारी, सर्व जिल्हा परिषद,

१२) मा. मंत्री/राज्यमंत्री (अल्पसंख्याक विकास ) यांचे खाजगी सचिव,

१३) महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, (प्रसिध्दीसाठी)

१४) सहसचिव/उपसचिव/अवर सचिव/सर्व कार्यासन अधिकारी, अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई

१५) निवडनस्ती, कार्यासन ९,